महाराष्ट्र राज्य सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशीय विकास बँक मर्या., मुंबई व जिल्हा सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशीय विकास बँकांबाबत धोरणात्मक निर्णय घेणेबाबत

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्र. एलडीबी-१०१३/प्र.क्र.६९९/७-स,**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,

दिनांक : -२४ जूलै, २०१५.

**<u>प्रस्तावना:-</u>**

महाराष्ट्र राज्य सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशीय विकास बँक मर्या., मुंबई या बँकेची स्थापना दि. ०७.१२.१९३५ रोजी झाली होती. सदर बँकेची रचना सन १९७३ पर्यत संघीय (Federal) स्वरुपाची होती. त्यानंतर दि. १.५.१९७३ पासून या रचनेमध्ये राज्य स्तरावर शिखर बॅक व जिल्हा स्तरावर जिल्हा स्तरीय बॅका असा बदल करण्यात आला. मात्र दि. १.१०.२००१ पासून या रचनेमध्ये पुन्हा बदल करुन बँकेची रचना संघीय स्वरुपाची करण्यात आली. त्यानुसार राज्य स्तरावर शिखर बॅक व २९ जिल्हा भूविकास बॅका अस्तित्वात आल्या. तथापी २९ जिल्हा सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशीय विकास बँकांचे कामकाज (कर्ज वाटप) सन १९९७-९८ पासून बंद झाल्यामुळे २००२ मध्ये शिखर बॅक व १४ जिल्हा भू-विकास बँका अवसायनात घेण्यात आल्या होत्या. सन २००८ मध्ये वैद्यनाथन समितीच्या शिफारशीच्या अनुषंगाने लाभ मिळवून या बँकाचे पुनरुनज्जीवन व पुनर्रचना करण्यासाठी दि.२२.५.२००८ रोजी शिखर बॅक व जिल्हा भूविकास बँकांच्या अवसायानाचे आदेश मागे घेण्यात आले. तथापि या बँकांचे पुरनुज्जीवन होऊ न शकल्यामुळे पुन्हा दि.१४.२.२००१३ रोजी शिखर बॅक व राज्यातील २७ जिल्हा भू-विकास बँका अववसायनात घेण्यात आल्या आहेत.

या बँकांची आर्थिक स्थिती विचारात घेऊन महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० च्या कलम १४२ मधील तरतूदीनुसार सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांच्यामार्फत राज्यातील जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना मध्यम मुदत व दिर्घ मुदत कर्ज वाटप करण्यासाठी परवानगी देण्यात आली आहे. सध्या राज्यातील शेतकऱ्यांना जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांमार्फत तसेच राष्ट्रीयीकृत / व्यापारी बँकांमार्फत मध्यम मुदत व दीर्घ मुदत कर्ज पुरवठा करण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्य सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशीय विकास बँक मर्या., मुंबई या बँकेस राज्य शासनाच्या हमीवर नाबार्डमार्फत दिलेल्या कर्जाच्या परतफेडीसाठी शासनामार्फत नाबार्डला भरीव रक्कम परत करण्यात आली आहे. या बँकांचे कामकाज अनेक वर्षापासून ठप्प असल्यामुळे या बँकांबाबत अभ्यास करुन शासनास शिफारस करण्यासाठी दि. १७/१२/२०१४ च्या शासन निर्णयाद्वारे मा. मंत्री (वित्त व नियोजन, वने) यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रीमंडळ उपसमिती नेमण्यात

आली होती. सदर समितीने दि. १८/३/२०१५ रोजी शासनास सादर केलेल्या अहवालाच्या अनुषंगाने राज्यातील भू-विकास बँकांबाबत धोरणात्मक निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशीय विकास बँक मर्या. मुंबई या बँकेबाबत धोरणात्मक निर्णय घेण्यासाठी नेमलेल्या मंत्रीमंडळ उपसमितीने केलेल्या शिफारशी स्वीकारण्यात येवून त्या अनुषंगाने या बँकांबाबत खालीलप्रमाणे धोरणात्मक निर्णय घेण्यात येत आहे:-

अ) **महाराष्ट्र राज्य सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशीय विकास बँक मर्या. मुंबई (शिखर बँक) व जिल्हा भू-विकास बँकांची अवसायन प्रक्रिया:-**

१. भू-विकास बँकांच्या अवसायन प्रक्रियेच्या अनुषंगाने ज्या प्रकरणी मा. उच्च न्यायालयाने स्थगिती दिली आहे अशा प्रकरणी अवसायन प्रक्रिया चालू ठेवण्याबाबत सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी मा. उच्च न्यायालयास विनंती अर्ज दाखल करावा. तसेच ज्या जिल्हा भू-विकास बँकांच्या अवसायन प्रक्रियेस मा. उच्च न्यायालयाने स्थगिती दिलेली नाही अशा जिल्हा भू-विकास बँकांच्या अवसायनाची प्रक्रिया पुढे चालू ठेवण्यात यावी.

२. कोल्हापूर व नाशिक या जिल्हा भू-विकास बँकांची आर्थिक स्थिती व बँकांचे कामकाज विचारात घेऊन या बँका चालू ठेवणे अथवा अवसायनात घेणे याबाबत संबंधीत जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था यांनी गुणवत्तेनुसार स्वतंत्रपणे निर्णय घ्यावा.

**ब) बँकेची कर्जवसुली:-**

१. शेतकऱ्यांनी भूविकास बँकेकडून घेतलेल्या कर्जाच्या वसुली संदर्भात दि.२८/९/२००७ व दि.३/१/२०१२ च्या शासन निर्णयानुसार ६% व्याज दराने व्याज आकारणी करण्याबाबत मंजूर केलेल्या एक रकमी कर्ज परतफेड योजनेस दि. ३१/३/२०१६ पर्यंत मुदतवाढ देण्यात यावी. या योजनेतंर्गत शेतकऱ्यांकडून कर्जाची रक्कम वसूल करतांना दि. १/४/२००४ नंतर बँकेने केलेले व्याजाचे मुद्दलीकरण रद्द करण्यात यावे. सर्व थकबाकीदार शेतकऱ्यांकडून दि. ३१/३/२००४ अखेर थकीत असलेल्या मुद्दल रकमेवर ६% व्याज दराने सरळ व्याजाने व्याजाची आकारणी करण्यात यावी.

२. एक रकमी कर्ज परतफेड योजनेत सहभागी न होणाऱ्या व दि. ३१/३/२०१६ पर्यंत एक रकमी कर्ज परतफेड योजनेनुसार कर्जाची परतफेड न करणाऱ्या शेतकऱ्यांच्या बाबतीत महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मधील तरतूदीनुसार वसुलीची कायदेशीर कार्यवाही करण्यात यावी.

**क) भूविकास बँकेच्या कर्मचा-यांची देणी तसेच सेवाविषयक बाबी:-**

१. शेतकऱ्यांकडील कर्जाची वसुल होणारी रक्कम व शिखर बँकेकडे सध्या उपलब्ध असलेल्या निधीतून शिखर बँकेच्या कार्यरत कर्मचाऱ्यांना नुकसान भरपाईसाठी लागणारी रक्कम व शिखर

बँकेच्या अवसायन प्रक्रियेसाठी लागणारी रक्कम वजा जाता उपलब्ध असलेल्या निधीतून जिल्हा भू-विकास बँकांच्या सध्या कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांच्या थकीत वेतनाची रक्कम प्राधान्याने अदा करावी. तसेच या कर्मचाऱ्यांना सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी सन २०१२ मध्ये शिखर बँकेच्या कर्मचाऱ्यांना लागू केलेल्या स्वेच्छा निवृत्ती योजनेच्या सूत्रानुसार नुकसान भरपाईची रक्कम अदा करण्यात यावी व अशा कर्मचाऱ्यांना बँकेच्या सेवेतून कमी करण्यात यावे. मात्र बँकेच्या कर्जाची वसुली व बँकेचे दैनंदिन प्रशासकीय कामकाज यासाठी अत्यावश्यक असलेला कर्मचारी वर्ग शिखर बँकेच्या बाबतीत सहकार आयुक्त व निबंधक यांच्या मान्यतेने व जिल्हा भू-विकास बँकांच्या बाबतीत संबंधित जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था यांच्या मान्यतेने सेवेत ठेवण्यात यावा व त्यांच्या सेवेची निकड कमी होईल त्यानुसार वरीलप्रमाणे नुकसान भरपाईची रक्कम अदा करुन अशा कर्मचाऱ्यांना कमी करण्यात यावे.

२. भू-विकास बँकांच्या कर्ज वसुलीच्या रकमेतून सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांची उपदान (Gratuity) व इतर वैधानिक देणी अदा करण्यात यावी.

३. शेतकऱ्यांच्या कर्ज वसुलीतून येणारी रक्कम कर्मचाऱ्यांची देणी अदा करण्यासाठी पुरेशी नसल्यास बँकांच्या मालमत्तेच्या विक्रीमधून उपलब्ध होणाऱ्या रकमेतून कार्यरत / सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांची देय रक्कम अदा करण्यात यावी.

४. ज्या जिल्हा भू-विकास बँकांची शेतकऱ्यांकडून येणे असलेल्या कर्जाची रक्कम कर्मचाऱ्यांना देय असलेल्या रकमेपेक्षा कमी आहे व ज्या बँकेकडे पुरेशी अथवा काहीच मालमत्ता नाही अशा जिल्हा बँकांच्या कर्मचाऱ्यांची देय रक्कम सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांच्या मान्यतेने शिखर बँकेमार्फत उपलब्ध करुन देण्यात यावी. यासाठी शिखर बँकेकडे पुरेसा निधी उपलब्ध नसल्यास अतिरिक्त निधी उपलब्ध असलेल्या जिल्हा भू-विकास बँकेकडून शिखर बँकेने हा निधी उपलब्ध करुन द्यावा.

५. बँकाच्या ज्या कर्मचा-याचे वय ५० वर्षापेक्षा कमी आहे अशा कर्मचा-यांच्या वयाची कमाल मर्यादा शिथील करुन असे कर्मचारी नोकर भरतीच्या प्रचलित पध्दतीनुसार व त्यांच्या शैक्षणिक अर्हतेप्रमाणे या शासन निर्णयाच्या दिनांकापासुन पुढील तीन वर्षापर्यंत राज्य शासनाच्या सेवेत भरतीसाठी पात्र ठरतील.

ड) **भूविकास बँकेचे शासनास येणे / देणे रकमेबाबत:-**

१. दिनांक २८/९/२००७ व दिनांक ३/१/२०१२ च्या शासन निर्णयानुसार एक रकमी परतफेड योजना लागू केल्यामुळे बँकेस झालेल्या नुकसानीची रक्कम (दिनांक ३१/३/२०१४ अखेर मुद्दल रु. ४२० कोटी व त्यावर १२% दराने होणारे व्याज रु. १८७ कोटी असे एकूण सुमारे रु. ६०७ कोटी) बँकेकडून शासनास येणे असलेल्या रक्कम रु. १८९७.२४ कोटी या रकमेत समायोजित करण्यात यावी.

२. एक रकमी परतफेड योजनेस (OTS) नव्याने मुदतवाढ दिल्यामुळे बँकेस होणाऱ्या नुकसानीची रक्कम (अंदाजे रु. ७१३ कोटी) शासनामार्फत सोसण्यात यावी व ही रक्कम भू-विकास बँकेकडून शासनास येणे असलेल्या रक्कम रु. १८९७.२४ कोटी या रकमेत समायोजित करण्यात यावी.

३. भू-विकास बँकांचे शासन देणे, कर्मचारी देणे व शेतकऱ्यांकडून येणे कर्ज यांचा ताळमेळ होण्याच्या दृष्टीने दिनांक ३१/३/२०१४ अखेरच्या आर्थिक पत्रकानुसार येणी-देणी निश्चित करण्यात आलेली असल्याने दिनांक १/४/२०१४ पासून बँकेकडून शासनास येणे असलेल्या रकमेवर तसेच शासनाकडून बँकेस देय असलेल्या रकमेवर व्याजाची आकारणी करण्यात येऊ नये.

४. भू-विकास बँकेने यापूर्वी राबविलेल्या एक रकमी परतफेड योजनेमुळे झालेल्या नुकसानीची रक्कम, एक रकमी परतफेड योजनेस नव्याने मुदतवाढ दिल्यामुळे बँकेच्या होणाऱ्या नुकसानीची रक्कम व शासनास हस्तांतरीत करण्यात येणाऱ्या बँकेच्या मालमत्तेची बाजारभावाप्रमाणे होणारी किंमत शासनास बँकेकडून येणे असलेल्या रकमेतून समायोजित केल्यानंतर काही रक्कम बँकेकडून शासनास येणे असल्यास अशी रक्कम निर्लेखित करण्यात यावी.

५. भू-विकास बँकांच्या दि. ३१/३/२०१४ अखेर निश्चित केलेल्या येणे / देणे रकमेमध्ये काही प्रमाणात बदल झाल्यास त्याबाबत वित्त विभागाचे अभिप्राय घेऊन सहकार विभागाच्या स्तरावर कार्यवाही करण्यात यावी.

इ) **भूविकास बँकेच्या मालमत्तेबाबत:-**

भू-विकास बॅकांच्या ६० मालमत्तांची सन २०१४-१५ मधील बाजारभावाप्रमाणे होणारी रक्कम अंदाजे रु. ५५५ कोटी बँकेकडून शासनास येणे असलेल्या रकमेमध्ये समायोजित करण्यात यावी. या ६० मालमत्तांपैकी काही मालमत्ता त्या त्या शहरात मध्यवर्ती ठिकाणी असल्यामुळे व अशा मालमत्ता शासनास भविष्यात उपयुक्त असल्यामुळे या सर्व मालमत्ता सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांच्यामार्फत शासनास हस्तांतरीत करुन घेण्यात याव्यात. उर्वरित मालमत्तांची ई-टेंडर प्रक्रियेद्वारे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांचेमार्फत विक्री करण्यात यावी. शासनाकडे हस्तांतरीत होणाऱ्या मालमत्तांची बाजारभावाप्रमाणे होणारी किंमत बँकेकडून शासनास येणे असलेल्या रक्कम रु. १८९७.२४ कोटी या रकमेत समायोजित करण्यात यावी.

शासन निर्णयात नमुद केलेल्या वरील बाबींचे सनियंत्रण करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर शासन निर्णयाची अमलबजावणी करण्यासाठी क्षेत्रीय अधिकाऱ्यांना अधिक मार्गदर्शक सुचना देण्याची

आवश्यकता असल्यास त्याबाबत सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी त्यांच्या स्तरावरुन परिपत्रकाव्दारे मार्गदर्शक सुचना निर्गमित कराव्या.

हा शासन निर्णय मा. मंत्री मंडळाच्या दि. १२ मे, २०१५ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयास अनुसरुन व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौसं २४०/१५/व्यय-२ दि. ०९/०६/२०१५ रोजीच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०७२४१२२६०४०७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Santosh Arun Patil

Digitally signed by Santosh Arun Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Officer On Special Duty, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=e52439642ab57c332b2a3e3e46f0d907ba6167409ef6d52c943bf775ecf042fd, cn=Santosh Arun Patil
Date: 2015.07.24 15:01:56 +05'30'

( संतोष पाटील )

विशेष कार्य अधिकारी

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा. मंत्री (वित्त व नियोजन, वने) यांचे खाजगी सचिव.
३. मा. मंत्री (महसूल, कृषी, पशुसंवर्धन, दुग्ध विकास आणि मत्स्यव्यवसाय) यांचे खाजगी सचिव.
४. मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव
५. मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
६. मा. विधान सभा सदस्य / मा. विधान परिषद सदस्य (सर्व).
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
८. अप्पर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई ०३२.
९. अप्पर मुख्य सचिव (सामान्य प्रशासन विभाग), मंत्रालय, मुंबई ०३२.
१०. प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ०३२.
११. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१२. अवसायक, महाराष्ट्र राज्य सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशीय विकास बँक म., मुंबई, १५-ए, मोरवी लेन, चौपाटी, मुंबई-४०० ००७.
१३. मुख्य महाप्रबंधक, राष्ट्रीय कृषि ग्रामीण विकास बँक, ५४, वेलस्ली रोड,शिवाजीनगर, पुणे-५
१४. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
१५. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
१६. जिल्हा व्यवस्थापक, जिल्हा सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशीय विकास बँक (सर्व).
१७. सर्व कार्यासने, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१८. निवड नस्ती.